# प्रस्तावना

गेल्या वर्षी पुण्यांत महाराष्ट्र साहित्य संमेलनाबरोबर कवि-संमेलनहि भरलें होतें. त्या कवि-संमेलनाचे स्वागताध्यक्ष श्री. विठ्ठलराव घाटे यानीं 'उद्यांचा थोर कवि' अशा गौरवदर्शक शब्दांनीं श्री. मंगेश पाडगांवकर यांचा सभेला परिचय करून दिलेला होता. त्या वेळीं 'करिं माझ्या दीप युगांचा रे' ही कविता श्री. पाडगांवकरांनीं मोठ्या तन्मयतेनें म्हणून दाखविलेली मीं ऐकिली होती. त्यापूर्वी कवीचा आणि माझा थोडा परिचय झाला असला तरी त्याच्या काव्याचा परिचय मात्र फारसा झालेला नव्हता. या वर्षी 'धारानृत्यां'तील बहुतेक कविता मीं कवीच्या मुखानेंच ऐकल्या; त्या मला आवडल्या. आणि म्हणूनच या संग्रहाच्या प्रकाशनाच्या निमित्तानें चार शब्द लिहिण्याचे मीं आनंदानें योजिलें आहे.

'खिन्न मांडवांत ये' ही या संग्रहांत शेवटीं छापलेली कविता कालदृष्ट्या सर्वांआधींची आहे आणि 'प्रकाशांतला शृंगार' ही कालदृष्ट्या सर्वांत अलीकडची आहे. म्हणजे गेल्या चार वर्षांतील स्फुट कवितांचा हा संग्रह आहे. कविप्रतिभेला तरुण वयांतच पहिला बहर येतो, हा साहित्याच्या इतिहासांतला अनुभव 'धारानृत्या'च्या निर्मितींतहि यथार्थ ठरलेला दिसतो. श्री. पाडगांवकर यांच्या कवितांत प्रतिभेच्या विलासाबरोबरच प्रज्ञेचा प्रकाशहि आढळतो, हें मात्र विशेष आहे. 'धारानृत्यां'त निसर्गाच्या सौंदर्यधारांची बरसात आहे, प्रेयसीच्या प्रेमधारा आहेत आणि मानवतेच्या जीवनधाराहि आहेत. 'कविता आज निराळी' या कवितेंत कवीनें आपला निराळेपणा स्पष्ट केला आहे. आपली कविता मानवतेस्तव प्रभूचा गर्भ उदरीं घेऊन आली असल्याचें त्यानें घोषित केलें आहे. समता, शुचिता आणि शांति यांची प्रस्थापना करण्यासाठीं ती निघाली आहे. मत्तांचें आसन कोसळवून तडितेप्रमाणें ही जाळून टाकणार आहे. संतांचा गौरव आणि जीवनवीरांचें वैभव गाणार आहे. विमोचनासाठीं ती झुंजणार आहे. या कवितेसाठीं जीवनांत नव्या देवाची निर्मिति केली पाहिजे, हें कवीनें दुसऱ्या एका कवितेंत गायिलें आहे. नव्या मानवासाठीं

नवा देव निर्मिल्याशिवाय नवें विश्व घडवितां येणार नाहीं, अशी कवीची श्रद्धा आहे. या श्रद्धेनें ' हे मानव ये ' असें नव्या मानवाला कवीचें आवाहन आहे. ' विधाता ', ' अश्रु ', ' जीवन! जीवन!', ' अजाण, अजाण!', इत्यादि कवितांतून आजच्या जगांतील विषमता आणि क्रूरता यांनीं भ्रष्ट झालेल्या मानवी जीवनाचें चित्रण केलेले आढळतें. तथापि मानवाचा ' नवा इतिहास ' येथें घडविला जात आहे, असाहि उज्ज्वल विश्वास कवीच्या हृदयांत आहे. आजच्या दलितांना ' उद्यांचें राज्य ' मिळवून देण्याचें या युगाचें आव्हानच आहे असेंहि कवि मानतो. आपल्या करांत युगांचा दीप आहे आणि उरांत उद्यांचा मानव आहे, आपण शांतीचे उद्गाते आहोत, अशी नवकवीची प्रतिज्ञा आहे. केशवसुतांपासून कुसुमाग्रजांपर्यंत अर्वाचीन मराठी काव्यांत मानवतावादाचा जो नवा सूर घोषित केलेला आढळतो त्याच ध्वनीचा पाडगांवकरांच्या कवितांत परिणामकारक आविष्कार झालेला आहे.

मानवतावाद क्रांतिकारक असला तरी त्याचा आधार मानवप्रेम असेल तरच त्याला नव्या जगाची निर्मिति करतां येईल. मानवप्रेमाचे प्रख्यात पैगंबर म्हणजे प्राचीन काळांतील बुद्ध आणि ख्रिस्त हे होत. ' धारानृत्यां 'त येशू ख्रिस्तासंबंधीं गौरवाचे उल्लेख असले तरी ख्रिस्तावर स्वतंत्र कविता नाहीं. परंतु ' येइ बुद्धराज ' या लहानशाच कवितेत बुद्धाचे जें आवाहन केलें आहे तें मराठी साहित्यांत अमर होण्यासारखें आहे. आधुनिक काळीं गांधींच्या रूपानें मानवप्रेमाचा क्रांतिकारक आविष्कार साऱ्या जगानें पाहिला. त्यांचें जीवन हाच त्यांचा संदेश आहे. त्या संदेशाचें गायन करणारी ' आमार जीवन ई आमार बानी ' ही कविता चांगली प्रातिनिधिक ठरण्यासारखी आहे. ' कर्मयोगी विश्वयोगी ' ही लहानशी कविता म्हणजे विश्वयोगाचें स्फूर्तिप्रद स्तोत्रच होय.

प्रेमाच्या म्हणजे प्रेयसीविषयक कविता या संग्रहांत पांच-सहाच आहेत. दर्शनापासून मीलनापर्यंतचे सारे भाव रम्यतेनें त्यांतून प्रकट झाले आहेत. विरहाचें चित्रण मात्र त्यांत कोठे केलेलें दिसत नाहीं. ' प्रकाशांतला शृंगार ' या कवितेतील भावचित्रणांत बरेच नावीन्य आहे, असें मला वाटतें. ' चिर-मीलन ' या कवितेत प्रेमानें या विश्वाचें रहस्य सायासाविण सहज उकललें, दुर्गम भवितव्याचें द्वार क्षणांत खुलें झालें, असें वर्णिलें आहे. वासना हें जरी

प्रेमाचे प्रारंभिक स्वरूप असलें तरी प्रेमाची परिणति व्यक्तीच्या विश्वात्मकतेंत होऊं शकते आणि यामुळेंच प्रेम ही जीवनविकासाची समर्थ साधनाहि मानतां येते.

भगवती उषेपरि तूं घनतमीं फुलावें
सखि, तूं गायत्रिमंत्र प्राणांतुनि गावें

ही कवीची आपल्या प्रेयसीपासून अपेक्षा आहे. सखिप्रेमांतून कवीनें प्रकाश-दान याचिलें आहे. बंधनांत मुक्ति आणि विप्लवांत आत्मशक्ति ठरून सखीनें आपणांस जागवावें, ही कवीची अपेक्षा प्रेमाचें आध्यात्मिक स्वरूप स्पष्ट करणारी आहे.

मानवता आणि प्रेम यांच्याखेरीज 'धारानृत्यां'त विशेषत्वानें आढळणारा तिसरा विषय निसर्ग-वर्णन होय. या संग्रहांतील निसर्ग-गीतें मला फारच आकर्षक वाटलीं. वसंत आणि शरद् या दोन ऋतूंची ठराविक संकेतांत केलेलीं वर्णनें पुष्कळ आढळतात. पण 'धारानृत्यां'त त्यांची भेट फारशी होत नाहीं. ग्रीष्म आणि वर्षा या ऋतूंवर कवीचें मन जडून गेलेलें दिसतें. या ऋतूंच्या वर्णनांत खूप ताजेपणा आढळून येतो. 'शहारला काजवा', 'जांभळी नीज ये', 'आज ये अवचित सजल सुवास' या कवितांतील भावनांची कोवळीक जितकी वाखाणण्यासारखी आहे, तितचीच 'आला वादळवारा', 'अतीत', 'रुद्रसौंदर्य' या कवितांमधील भावनांची उद्दाम वृत्तिहि वर्णन करण्यासारखी आहे. वायु आणि पृथ्वी या दोन महाभूतांचीं दोन स्वतंत्र सूक्तें या संग्रहात आढळतात. हीं दोनहि सूक्तें मराठी साहित्यांत आपल्या वैशिष्ट्यामुळें सदैव विलसत राहतील. तथापि पंचमहाभूतांपैकीं कवीचें खरें प्रेम आहे तेजस् तत्त्वावर. प्रकाशनपूजन ही कवीची मुख्य प्रवृत्ति आहे. प्रकाशाच्या पूजेचा ध्यास लागल्यामुळें निसर्गाच्या बाह्य-प्रकाशावर कवीचें समाधान होत नाहीं. त्याला अंतरींच्या आत्मप्रकाशाचीहि ओढ तीव्रतेनें लागलेली दिसते. 'वीज तूं होऊन ये गे', 'आणि उजळित तम मज जळूं दे' या कवितांतून ती ओढ चांगल्या रीतीनें व्यक्त झाली आहे.

या संग्रहांतील 'नवी वाट' ही कविता या दृष्टीनें अभ्यासिण्यासारखी आहे. सीमेंत बद्ध झालेलें सारें विश्व असीम होण्यासाठीं जणुं नित्य धडपडत

असतें. निःशब्दाची स्वप्नरागिणी जेथें कणाकणांनून मोहरेल तेथें शब्दावांचून अनंत कविता नित्य कां फुलून येणार नाहींत? तेथें मौनाच्या कलशांत तृप्तीचें अमृत जणुं भरून येईल. मानवाचीच काय पण साऱ्या विश्वाची जीवनयात्रा त्या वाटेतवच चाललेली आहे. तेथेच कवीचेहि गाणें पूर्णपणें फुलणार आहे. जीवनांत जमविलेलीं सुखदुःखाचीं रत्नें तेथेंच उधळून देतां येतील.

**कोण तिथें आतुर माझ्यास्तव**
**घेउन कसलें अनुपम वैभव?**
**छंद कोठले, शब्द कोठले, बघती वाट सजून**

हें जरी स्पष्ट सांगतां आलें नाहीं तरी तीं अज्ञाताची नवीन वाट जीवनाच्या क्षितिजापुढतीं दुरून दिसत आहे एवढें मात्र खरें. अज्ञाताची वाट म्हटली म्हणून कांहीं बिचकून जाण्याचें कारण नाही. जीवनांतील सकल कर्मांचा जीवनाच्या सहजगानाशीं विरोधच असला पाहिजे असें नाहीं. जेथें व्यक्तित्वाचा क्षुद्र अहंकार गळून पडतो आणि विश्वजीवनाशीं लय साधतें तेथें कर्म नितनूतन सृजन बनतें. या अनुभूतीचें 'सकल कर्म आज मला सहजगान' या कवितेंत सुंदर आविष्करण झालें आहे. विश्वात्म्याचें वैभव जीवाभोवतीं दाही दिशांनीं भरून राहिलेलें आहे. परंतु वासनेच्या गजबजाटांत गुंतल्यामुळें जीवाला तें वैभव ओळखतां येत नाहीं. फुलांमधून मानवी हृदयाकडे येणारे संदेश वाचले जात नाहींत, पर्णांची कुजबूज निरर्थच भासते आणि उपभोगांतहि वैफल्याची विपारी आग जळत राहते. सरितेच्या प्रत्येक बिंदूला जसें सागराचें निमंत्रण ओढीत असतें त्याप्रमाणें जीवाच्या उरांतहि विश्वत्म्याचें आमंत्रण दडून राहिलेलें आहेच. तें आमंत्रण घुमूं लागलें म्हणजे घन अंधारांत आकाशरागिणी उमलते. आणि मग—

**गूढ कधीं रात्रीं एकांतीं**
**तुझ्या खुणा प्राणांत उजळती**
**आणि व्यथेची वीणा स्रवते मीलनस्वर जरतारी**

असा अनुभव येतो. विश्वात्म्याच्या ज्योतिर्मय संसारांत हंसत सर्वस्व-विलोपन करून जाण्यासाठीं लौकिकार्थानें भिकारी झालें पाहिजे.

**होउनि मी येईन भिकारी**
**निरव रात्रीं तुझ्या प्रियकरा नक्षत्रांच्या दारीं**

या कवितेंत विश्वात्म्याच्या विभवाची कवीच्या जीवाला लागलेली तळमळ उत्कटतेनें व्यक्त झाली आहे.

निसर्गाकडे पाहण्याच्या शास्त्रज्ञ आणि कवि यांच्या दृष्टि भिन्न असतात. ज्ञानानें निसर्गावर विजय मिळवावा आणि त्याच्याकडून आपलें जीवन सुखसंपन्न करावें ही शास्त्रज्ञाची दृष्टि असते. कवि निसर्गाच्या सौंदर्याशीं समरस होऊन आनंदाची प्राप्ति करून घेतो. मानवी जीवन या दोघांच्याहि प्रयत्नांनीं समृद्ध होत राहतें. तथापि कवीच्या द्वारा जीवनाला प्राप्त होणारी समृद्धि विशेष मोलाची मानतां येईल. विजयामध्यें माणसाच्या प्रतिष्ठेची प्रतीति येते ही गोष्ट खरी असली तरी विजयामुळें अहंकार आणि उन्माद हेहि वाढूं लागतात. काव्याचा आस्वाद घेण्यासाठीं कवीला काय किंवा रसिकाला काय अनासक्त व्हावें लागतें. या अनासक्तींतच मानवाची मुक्ति भरून राहिलेली आहे. काव्याच्या आस्वादनानें आनंदलोकांतील मुक्ति मिळूं शकत असल्यामुळे मानवी संसारांत काव्याचें स्थान श्रेष्ठ समजलें गेलें आहे. 'धारानृत्यां' तील कित्येक कविता अशा श्रेष्ठ काव्याचे चांगले नमुने आहेत, असें मला खरोखरच वाटतें.

हुबळी,
कार्तिक पौर्णिमा,
२४-११-५०

**स. ज. भागवत.**

# कवितांचा अनुक्रम



---

# धारानृत्य

आज धारानृत्य चाले, आज धारानृत्य चाले.

क्षुब्ध धारा, उग्र धारा,
वज्र धारा, रुद्र धारा,
क्षाळण्या भूगोल सारा जीवनाचे ओघ आले
आज धारानृत्य चाले, आज धारानृत्य चाले.

धुंद लाटा सागराच्या
क्षोभती वक्षीं गिरीच्या
मस्तकीं अन् या तमाच्या हे विजांचे लाख भाले
आज धारानृत्य चाले, आज धारानृत्य चाले.

वैभवानें डोलणारे
तुच्छतेनें हांसणारे
उन्मळोनी वृक्ष सारे या तृणाशीं एक झाले
आज धारानृत्य चाले, आज धारानृत्य चाले.

भेदुनी बाहू तटांचे
गांजणाऱ्या बंधनांचे
स्रोत हे साऱ्या नद्यांचे सागराला या मिळाले
आज धारानृत्य चाले, आज धारानृत्य चाले.

## धारानृत्य

भंगुनी कारा तमाची
लंघुनी सीमा ढगांची
स्वप्नतृप्ती ही धरेची कोटि धारांनीं उमाळे
आज धारानृत्य चाले, आज धारानृत्य चाले.

दिव्य वाणी ही कवींची
अन् तपस्या ही मुनींची
आत्मशक्ती योगियांची विश्वप्राणांतून खेळे
आज धारानृत्य चाले, आज धारानृत्य चाले.

प्राण पाषाणांत आले
बद्ध आत्मे मुक्त झाले
मुक्त तारे, मुक्त वारे, मुक्त पृथ्वी, मुक्त सारे
आज धारानृत्य चाले, आज धारानृत्य चाले.

मीं उद्यांच्या जीवनाचीं
पेरिलीं बीजें विजेचीं
प्रज्वळोनी प्राणवीची त्यांतुनी उन्मेष आले
आज धारानृत्य चाले, आज धारानृत्य चाले.

पुणें,
६-१०-४८

---

# करिं माझ्या दीप युगांचा रे

करिं माझ्या दीप युगांचा रे !
उरिं मानव दिव्य उद्यांचा रे !

कृतान्तमुख तम जिथें दाटुनी
सजे गिळाया दुबळी धरणी
तिथें ज्वलन मम प्रगटे हंसुनी
मी प्राणगोल सूर्यांचा रे
करिं माझ्या दीप युगांचा रे !

धर्म जिथें प्रगतीचें बंधन
गरळ दुहीचें ओकिति अनुदिन
नित अपमानित सत्य सनातन
मी प्रलय अशा विश्वाचा रे
करिं माझ्या दीप युगांचा रे !

जे खपती क्षेत्रांतुन अविरत
जळत, उसासत, क्रंदत, सोसत
पायदळीं परि ज्यांचें जीवित
मी ध्वनि त्यांच्या आशांचा रे
करिं माझ्या दीप युगांचा रे !

## धारानृत्य

कला जिथें धनिकांची दासी
स्वार्थासाठीं क्षुद्र विलासी
घरोघरीं प्रभु नग्न, उपाशीं
मी क्षोभ तिथें क्रांतीचा रे
करिं माझ्या दीप युगांचा रे!

माते धरणी! तूं अपमानित
फुटुनि ऊर तव, वाहे शोणित
हे जनते! तूं लांछित वंचित
तुम्हि माझे, मी सर्वांचा रे
करिं माझ्या दीप युगांचा रे!

जीवन मज नित नवें अमरपण
फुलांफळांतुन तृणांतृणांतुन
समर्पणांतच मज संजीवन
मी उद्गाता शांतीचा रे
करिं माझ्या दीप युगांचा रे!

मुंबई,
८-१२-४८

# वीज तूं होऊन ये गे

वीज तूं होऊन ये गे अग्नि तूं होऊन ये,
आंतला अंधार हा जाळीत ये, जाळीत ये !

प्रेम माझें वासनांनीं होय जेव्हां आंधळें
अन् विलासीं अंतरींची ध्येयमूर्ती काजळे
माझिया प्राणांतुनी, ध्यानांतुनी, गे उज्ज्वले
चिन्मयी ज्योतिर्मयी तूं जागृती होऊन ये
आंतला अंधार हा जाळीत ये, जाळीत ये !

शक्ति माझी दीन जेव्हां होउनी दासापरी
हीन माझ्या लालसांची आंधळी सेवा करी
उग्र तूं कल्पान्तिच्या ज्वाळांतुनी कालीपरी
अंतरींच्या दानवांचें वक्ष गे, भेदीत ये !
आंतला अंधार हा जाळीत ये, जाळीत ये !

क्षुद्र मी दुःखांत माझ्या व्यग्र होतां जीवनीं
वा सुखाचें अभ्र माझ्या दाटतां या लोचनीं
होउनी ज्वालामयी उल्केपरी व्योमांतुनी
गे युगांची मोहनिद्रा दर्शनें वारीत ये
आंतला अंधार हा जाळीत ये, जाळीत ये !

## धारानृत्य

गे भयानें मृत्युच्या मी विद्ध जेव्हां होउनी
मोक्ष शांती शोधण्याला हिंडतां रानीं वनीं
हांसऱ्या पुष्पांतुनी, पर्णांतुनी, वायूंतुनी
निर्मितीच्या अंतरींची तूं गती होऊन ये
आंतला अंधार हा जाळीत ये, जाळीत ये !

मोहरे उल्हासमूर्ति सृष्टि माझ्याभोंवतीं
अन् ऋतू आनंदगीती अंतरीं आलापिती
विश्वयात्रा चालली ही पूर्ण त्या स्वप्नाप्रती
दिव्य त्या स्वप्नांतरींची सांगता होऊन ये
आंतला अंधार हा जाळीत ये, जाळीत ये !

ख्रिस्तकुलाश्रम-तिरूपतूर,
३०-६-४८

———

# हें जीवन-क्षितिज

हें जीवन-क्षितिज आज उग्र भयद भासे
कालकूट पिउन, विकट कुटिल जलधि हांसे

खिन्न मेघ खिन्न गगन
खिन्न दिशा खिन्न भुवन
काजळून स्थिरचर हें टाकितें उसासे
हें जीवन-क्षितिज आज उग्र भयद भासे

आक्रंदत वीज जळे
धगधगून तम उकळे
वज्राविद्ध गिरि ढळती दुष्ट स्वप्नभासें
हें जीवन-क्षितिज आज उग्र भयद भासे

सुकले पुष्पांत कोश
द्रुम, दल, जल, मृत्युविवश
विषवायू करित दंश तुडवित उपहासें
हें जीवन-क्षितिज आज उग्र भयद भासे

घोर हा विनाश बघुन
घे धरणी मिटुन नयन
भयविवर्ण विश्वप्राण काजळ-कलि ग्रासे
हें जीवन-क्षितिज आज उग्र भयद भासे

## धारानृत्य

करिं एका अग्निकमल
वीणेवर दुसरा कर
छेडित संहार-राग निर्मिती विलासे
हें जीवन-क्षितिज आज उग्र भयद भासे

हें जीवन ज्योतिर्मय
चिरनूतन, चिरनिर्भय
फुलव त्वरित भुवनदीप संजीवक श्वासें
हें जीवन-क्षितिज आज उग्र भयद भासे

पुणें,
३-१०-४८

---

# आज पहांटे

आज पहांटे, उमले स्वप्न कांचनाचें
थरथरले प्राणांतुन पुलक अमृताचे

सरला तम, सरला तम सारा
शुभसूचक उदित शुक्रतारा
मुदित, स्नात लहरींवर शुभ्र फेन नाचे
आज पहांटे, उमले स्वप्न कांचनाचें

सजले तरु, सजल्या जलधारा
गंध पिउन हंसत फिरे वारा
झुळझुळलें स्मित हिरवें कोंवळ्या तृणाचें
आज पहांटे, उमले स्वप्न कांचनाचें

गिरिचें तप सफल आज झालें
झगमगलें निर्मल जल सारें
चिखला उःशाप आज मंगल कमलांचे
आज पहांटे, उमले स्वप्न कांचनाचें

गुणगुणलें वन मंगल कांहीं
गुणगुणल्या मधुर दिशा दाही
नयनदलीं दंव हंसलें शुभ्र भावनांचें
आज पहांटे, उमले स्वप्न कांचनाचें

## धारानृत्य

जग सगळें पूजनमय झालें
देत अभय उदय-राज आले
कवन कुणीं विणिलें पर्णांतुन किरणांचें
आज पहांटे, उमले स्वप्न कांचनाचें

हृदया चल विसर आज सारें
विश्वकमल पूर्ण फुलुनि आलें
चिरमीलन त्यांत प्राण आणि प्रकाशाचें
आज पहांटे, उमले स्वप्न कांचनाचें

मुंबई,
२१-१-५०

---

# उजळ सखि नयनांतिल फुलवात

उजळ सखि नयनांतिल फुलवात
फुलव गडे तेजाचा मोहर या घन अंधारांत

उधळ स्मितांतुन कांति उषेची
शब्दांतुन कुजबुज पर्णांची
फुलव दर्शनें सौंदर्याचा स्वर्गच संसारांत
उजळ सखि नयनांतिल फुलवात

धूपापरि तूं जळसी अनुदिन
करित सुगंधित अवघें जीवन
जळुन मनोमल, मंगल सगळें तुझिया सहवासांत
उजळ सखि नयनांतिल फुलवात

गुणगुणतां तूं घरिं अपुल्याशीं
फुलति उरीं अमृत-सुख-राशी
नीरवतेंतुन स्वरस्वप्नांचा मोहर ये बहरांत
उजळ सखि नयनांतिल फुलवात

मध्यरात्रिं सखि तुझ्या मिठींतुन
मृदुमादक स्वप्नांचें दर्शन
आणि पहांटे प्रकाशपूजन दिव्य तुझ्या नयनांत
उजळ सखि नयनांतिल फुलवात

## धारानृत्य

विद्ध कधीं होतांच भावना
कुरवाळिशि तूं व्यथा, यातना
अन् ज्योत्स्नेपरि सुखस्वप्नांची करिशि शिरीं बरसात
उजळ सखि नयनांतिल फुलवात

या सेवेंतुन तुझ्या वत्सले
पूजेचें पावित्र्य दरवळे
रस सगळे सखि तीर्थ होउनी तृप्त तुझ्या हृदयांत
उजळ सखि नयनांतिल फुलवात

तूं हृदयीं नितनूतन आशा
स्पर्शें तव, पावन अभिलाषा
तुझेंच मंगल दर्शन माझ्या उमले या कवितांत
उजळ सखि नयनांतिल फुलवात

पुणें,
९-९-४९

# मीलनरात

आज सखि अपुली मीलनरात
गंधित मधुरस ओघळला बघ छायांच्या स्वप्नांत

कुरळ कुंतलीं सुरंगिचा सर
सखि, हंसला स्पर्शतांच हा कर
अंगलगींतून सप्तरंग बघ मोहरले निमिषांत
आज सखि अपुली मीलनरात

मधांत सखि तव भिजली कुजबुज
कधिं न देखिलें स्वप्न दिसे मज
परिमळले सखि सुगंध त्यांतुन जे अपुल्या हृदयांत
आज सखि अपुली मीलनरात

कणाकणांतुन गंधर्वांनीं
स्पर्शसुखाचीं म्हटलीं गाणीं
सखि स्वरकोमल स्वप्नफुलांची शिरिं अपुल्या बरसात
आज सखि अपुली मीलनरात

स्तिमित, चकित गे, भंवतींचें जग
युगायुगांची विरली तगमग
नवल ! तृषेला मुक्ति मिळे गे तृप्तीच्या स्वर्गांत
आज सखि अपुली मीलनरात

## धारानृत्य

श्वास रोधुनी दोघें आपण
उरीं अनावर अपुल्या स्पंदन
युगायुगांचें संचित सखये ! सुफलित याच क्षणांत
आज सखि अपुली मीलनरात

उद्यां गडे या दिशा उजळतिल
हंसेल उजळुन नील सरोवर
दिसशिल तूं मज प्राची उज्ज्वल घेउनि रवि गर्भांत
आज सखि अपुली मीलनरात

मुंबई,
४-७-४९

———

# आज ये अवचित सजल सुवास

आज ये अवचित सजल सुवास
भिजलेल्या नवथर धरणींतून दरवळला उल्हास

मुग्ध चकित मन पुलकित होउन
फुललें नटवित मळलें जीवन
अन् प्राणांतुन नवकवितांचा उमले अमर विलास
आज ये अवचित सजल सुवास

थरथरलें पर्णांतुन कंपन
उरीं फुलांच्या सुगंधगुंजन
पुलक दंवाचे रचिति तृणांतुन रत्नांची आरास
आज ये अवचित सजल सुवास

शुचिर्भूत तरु उभे मुनीसम
उरिं त्यांच्या जागृत पुरुषोत्तम
काय-तयांच्या ध्यासांतिल ये विश्व नवें उदयास
आज ये अवचित सजल सुवास

आज न पवना क्षणभर अवसर
विहरे करित सुगंधित परिसर
उरीं तयाच्या नवस्वप्नांचा मंगल पदविन्यास
आज ये अवचित सजल सुवास

## धारानृत्य

रिमझिम रिमझिम ये सरिवर सर
गिरि, दरि, सागर, स्वप्निल निळसर
निळ्या लयींतुन आज कालचें हसलें क्षितिज उदास
आज ये अवचित सजल सुवास

आज माझिया गवाक्षांतुनी
युगस्वप्नांची चाहुल घेउनि
कोण येत घरिं उरीं जागवित सांत्वन अन् विश्वास
आज ये अवचित सजल सुवास

मुंबई,
३०-५-४९

---

# आला वादळवारा

आला वादळवारा
अन् घरट्यांतिल युगायुगांचा सरला आज निवारा

क्षुब्ध वीज पखवाज वाजवित
त्या तालावर नाचत नाचत
येइ सांचल्या अंधारांतुन फुलवित लाल निखारा
आला वादळवारा

गिरीदरींतुन लोटित प्रस्तर
क्षोभवीत थिजलेला सागर
तुडवित उडवित फुंकर घालित जळलेल्या अंधारा
आला वादळवारा

उन्मळलीं गोपुरें देवळें
जीर्ण वृक्ष कोसळले जळले
भस्म तयांचें लावित फिरतो दाहि दिशांच्या भाळा
आला वादळवारा

निजलेल्या बीजांच्या हृदयीं
कुजबुजला हा अद्भुत कांहीं
आणि उसळला क्षणांत गगनीं उधळित युगसंसारा
आला वादळवारा

## धारानृत्य

मीही माझें उधळुन घरकुल
सर्वस्वावर ठेवुन पाउल
रेखिण्यास अज्ञात चाललों उजळुन आंतरज्वाला
आला वादळवारा

मुंबई,
२३-११-४८

---

# विधाता

अर्धनग्न आज उभा मजपुढें विधाता !
पसरुन निजकर दोन्ही अन् लववुन माथा

तळमळून, वळवळून
बालक निजलें शिणून
कटिवर घेऊन श्रमे शोधण्यास दाता
अर्धनग्न आज उभा मजपुढें विधाता !

आवरीत, सांवरीत
निजलज्जा लक्तरांत
हीन दीन हिंडतसे आज विश्वभ्राता
अर्धनग्न आज उभा मजपुढें विधाता !

तप्त धरा चरणतळीं
वर्षत रवि अग्नि शिरीं
असुनिही सहस्रनेत्र तोहि अंध आतां
अर्धनग्न आज उभा मजपुढें विधाता !

रुधिर नयनिं सांकळलें
अन् पद वळले, गळले
कणभरही अन्न परी लागलें न हाता
अर्धनग्न आज उभा मजपुढें विधाता !

धारानृत्य

ये मूर्च्छा, थरथरला
आणि पथीं कोसळला
कुणि न सांवरावयास आज विश्वनाथा
अर्धनग्न आज उभा मजपुढें विधाता !

थरथरला स्वर्ग वरी
आणि दिशा विद्ध उरीं
कोटि पुत्र असुनि ठरे वांझ पृथ्विमाता
अर्धनग्न आज उभा मजपुढें विधाता !

मुंबई,
२०-९-४९

---

# होउनी मी येईन भिकारी

होउनी मी येईन भिकारी
नीरव रात्रीं तुझ्या प्रियकरा नक्षत्रांच्या दारीं

जोंवर मन संचयांत रुतलें
अभिलाषांतच स्वप्न गुंतलें
तोंवर तुझिया या विभवाची मी न सख्या अधिकारी
होउनी मी येईन भिकारी

मूक तोंवरी तुझीं फुलें मज
निरर्थ अन् पर्णांची कुजबुज
उपभोगांतहि वैफल्याची जळते आग विषारी
होउनी मी येईन भिकारी

गजबजलेल्या घरांत अनुदिन
तुझें उरीं घुमतें आमंत्रण
गहन तुझी आकाश-रागिणी उमले घन अंधारीं
होउनी मी येईन भिकारी

गूढ कधीं रात्रीं एकांतीं
तुझ्या खुणा प्राणांत उजळती
आणि व्यथेची वीणा स्रवते मीलन-स्वर जरतारी
होउनी मी येईन भिकारी

## धारानृत्य

सांग कधीं व्हायचें समर्पण
सहज हंसत सर्वस्वविलोपन
रिक्त होउनी तुझ्या यायचें ज्योतिर्मय संसारीं
होउनी मी येईन भिकारी
नीरव रात्रीं तुझ्या प्रियकरा नक्षत्रांच्या दारीं !

मुंबई,
२७-१-५०

---

# वायूस

अंतरीं तूं जीवनाची घेउनी मंदाकिनी
वाहसी कालापरी ओघांतुनी, वेगांतुनी
शांत तूं चंद्रापरी अन् उग्र तूं रुद्रापरी
हर्ष तूं जो मध्यरात्रीं सागरीं, कालोदरीं

वाहतां मीं पाहिलें वायू तुला मेघांसवें
प्राशितांना पाहिलें मीं तारकांचीं आंसवें
ऐकिली वीणा तुझी रायांतली छायांतली
चंद्र माझ्या भावनांचे तोषले अभ्यंतरीं

पर्वतांना भव्य तूं प्रेमें कधीं आलिंगिसी
अन् कधीं बाळांपरी तूं या तृणा घेसी कुशीं
डोलती जेव्हां फुलें आनंदुनी, उल्हासुनी
तूंच त्यांचा गंध वायू, आणिसी रे वाहुनी

दूत तूं येशूपरी रे प्रीतिचा अन् शांतिचा
अंतरात्मा पाहसी कर्मांत तूं विश्रांतिचा
तूं विरागी राहसी हें विश्व सारें व्यापुनी
पोहसी हंसापरी अन् पृथ्विच्या स्वप्नातुनी

## धारानृत्य

कोठुनी यावी अम्हां वायू, तुझी स्नेहार्द्रता
भावनेची भव्यता अन् अंतरींची शांतता
रे, जरेचा शाप येथें आमुच्या या यौवना
शृंखलांनीं बद्ध झाल्या आणि साऱ्या भावना

वासनांचें दास झालें प्रेम या पृथ्वीवरी
शक्ति अन् स्वार्थास येथें पूजितें देवापरी
अर्भकांची कोवळ्या घे, धर्म येथें आहुती
कौरवांचे हात येथें द्रौपदीला ओढिती

जाणिसी तूं दुःख हें माझ्या जिवाला जाळितें
जाणिसी तूं शल्य हें आत्म्यास माझ्या विंधितें
मी जळें निद्रेविना, शांतीविना शय्येवरी
लोपलेल्या अमृता मी शोधितों माझ्या उरीं

गाढ रे माया तुझी आहे परी माझ्यावरी
हांसुनी बाहूंत तूं घेसी मला आईपरी
विद्ध मी होतांच रे तूं चुंबिसी हीं लोचनें
वेदनांचें आंसवांचें होय स्पर्शें चांदणें.

कोणत्या जन्मीं जडे प्रीती अशी ही आपुली
तूंहि वायू, जाणिसी रे प्रेम जें माझ्या उरीं
मृत्यु येतां सांग तूं येशील ना रे धांउनी
अन् मला घेशील ना चित्तीं तुझ्या सामावुनी

मीं तुझ्याशीं एक व्हावें अन् भ्रमावें योजनें
जीवनाचा श्वास व्हावें अन् युगांचीं गुंजनें
पर्वतांना, सागरांना, मानवांना जीवनीं
अमृताची ओप द्यावी चुंबुनी आलिंगुनी.

मुंबई,
२०-१२-४७

———

## त्यांचें राज्य उद्यांचें

त्यांचें राज्य उद्यांचें
अखंड श्रमुनी अर्धनग्न अनिकेत क्षुधार्त अशांचें

जे कुणि नांगर घेउन खपती
घाम गाळुनी अन्न पिकविती
उपाशीच राहून आणिती —
उदया स्वप्न वरेचें
त्यांचें राज्य उद्यांचें

घरघरणाऱ्या यंत्रांमधुनी
अहोरात्र अन् जे कुणि श्रमुनी
तपस्याच जणुं घोर मांडुनी —
निर्मिति वस्त्र जगाचें
त्यांचें राज्य उद्यांचें

आणिक जे कुणि नित सेवारत
राहुनियां अस्पृश्य अधोगत
ज़ीवनभर अन् घाणच उपसत —
प्रेषित श्रमधर्माचे
त्यांचें राज्य उद्यांचें

जळतां भास्कर माथ्यावरती
दगड विटा जे हंसत वाहती
निज कष्टांतुन आणि निर्मिती—
ताजच सौंदर्याचे
त्यांचें राज्य उद्यांचें

प्रवेश ज्यांना कधिं न महालीं
घरें जयांचीं आणि पथावरि
खरेच वारस असती जे परि—
बुद्धाचे, ख्रिस्ताचे
त्यांचें राज्य उद्यांचें

या राज्यास्तव यज्ञ मांडिले
कुणिं अपुलें सर्वस्व उधळिलें
रक्ताश्रूंतुनि त्याच पेटलें—
हें आव्हान युगाचें
त्यांचें राज्य उद्यांचें.

मुंबई,
२२-९-४९

# मानव आणि फूल

मानव :—

“ कां हंससी तूं सांग फुला
सांग मला रे सांग मला

इथलें यौवनवैभव क्षणभर
गंध रंग रस संगत पळभर
पडतां रे निर्माल्य धरेवर

जग इथलें तुडविल तुजला
कां हंससी तूं सांग फुला

दास इथें भोगाची प्रीती
अन् गुलाम स्वार्थाची नीती
बघ मृगजळसम भंगुर नातीं

यौवनास ग्रासे इथें जरा
कां हंससी तूं सांग फुला

मधु सरतां रे भ्रमर विसरती
दुःसह विरहीं स्वप्नें जळतीं
विपरित सगळ्या इथल्या रीती

हें सत्य काय नच कळे तुला
कां हंससी तूं सांग फुला

मृदुल पाकळ्या क्षणांत गळतिल
जीवन-स्वप्नें धुळींत मिळतिल
पथिक चरणतळिं तुजसि तुडवितिल
रे क्षणिक मोह आवर अपुला
कां हंससी तूं सांग फुला"

*　*　*　*

फूल :—

"हें जग सगळें सुंदर मजला
मजमुळें धरा सुजला सुफला
गंध न; हें मधुगान प्रीतिचें
रंग तरल अन् उषास्वप्निंचे
परागांत युगवसंत नाचे
रे कृतार्थ हृदयीं वसुंधरा
हें जग सगळें सुंदर मजला
मार्दवांत स्मित प्रभुचें खुलतें
त्यांतुन पवना अमृत मिळतें
डुलतां स्वप्न नभाचें झुलतें
मज धरा शिरीं अथवा विसरा
हें जग सगळें सुंदर मजला

पतनांतुन मम जन्म फळांचे
उरीं जयांच्या वृक्ष उद्यांचे
जरा-मरण, मज भय न कशाचें
हा मंगल जीवन-योग खरा
हें जग सगळें सुंदर मजला

जे शोधिति स्वास्थ्यांतुन शांती
स्वार्थ जयांची जीवनतृप्ती
अन् उपभोगच ज्यांची नीती
ते विषमय ही करितात धरा
हें जग सगळें सुंदर मजला

क्षणांत माझ्या हंसे चिरंतन
कणांत इवल्या विकसे त्रिभुवन
भंगुरतेंतुन शाश्वत गुंजन
रे अतीत ही मरणास कला
हें जग सगळें सुंदर मजला ”

पुणें,
१२-६-४९

---

# अतीत

आज तूं भयकर वादळवात

येसि करित उद्घोष भयद तूं
रुद्ररोष आक्रांत प्रलय तूं
नाचत फुंकिसि शंख मृत्युचा भीषण अंधारांत
आज तूं भयकर वादळवात

नयनिं दिशांच्या धूळ दाटली
अन् नभिंची ग्रहमाला तुटली
फुटलें काळिज अंधाराचें होउन चरणाघात
आज तूं भयकर वादळवात

जटा मोकळ्या उडवित उडवित
चरणिं सिंधुचें मस्तक तुडवित
निज नाभींतुन लोळ अग्निचे उधळिसि अवकाशांत
आज तूं भयकर वादळवात

या मिटलेल्या द्वारावरती
तुझ्या विजांचे घण कोसळती
भयकंपित थरथरते हलते माझ्या ज्योत करांत
आज तूं भयकर वादळवात

## धारानृत्य

आजवरी ही ज्योत रक्षिली
भिंत उभारुन अन् पूजियली
समजुन वैभव आणि नाचलों सुखकर अंधपणांत
आज तूं भयकर वादळवात

आज हिची परि क्षिती कुणाला
कसलें रक्षण? आणि कशाला?
स्वयेंच विझवुन हंसत नाचतों लयींत उग्र विराट
आज तूं भयकर वादळवात

खळखळ या कोसळती भिंती
फुटती पडती तुझ्यांत विरती
दिक्कालांचे तट ढांसळती तुझिया उन्मादांत
आज तूं भयकर वादळवात

तुटलें रे तुटलें हें बंधन
या प्राणांचे अडसर निखळुन
नाचे जीवन मरण होउनी एक महानादांत
आज तूं भयकर वादळवात

मुंबई,
१७-९-४९

---

# चिरमीलन

सखि हें चिरमीलन हृदयांचें

स्तिमित सावल्या अधिकच लवल्या
मृदुल लता थरथरल्या, हलल्या
गहिंवरुनी उरिं सुगंध भिजले अवचित कोश फुलांचे
सखि हें चिरमीलन हृदयांचें

नवलच नच का जवळिं न येतां
मुळिं न बिलगतां, मुळिं न बोलतां
लय विश्वाची उजाळित जुळले दिव्य प्राण उभयांचे
सखि हें चिरमीलन हृदयांचें

कुणिं न लावितां दीप उजळले
महागान मौनांतुन फुललें
स्पर्शाविण रोमांच बहरले कणकणिं तरल स्वरांचे
सखि हें चिरमीलन हृदयांचें

कसला सखि हा क्षण गे ! अद्भुत
काय फुले जननांतर संचित
सायासाविण सहज उकललें रहस्य या विश्वाचें
सखि हें चिरमीलन हृदयांचें

## धारानृत्य

प्रज्वळल्या गात्रांतुन ज्योती
उजळित परिसर, उधळित कांती
क्षणांत झालें द्वार खुलें मज दुर्गम भवितव्याचें
सखि हें चिरमीलन हृदयांचें

बघ सखि अपुल्या भंवतीं स्थिरचर
याच क्षणापरि मंगल सुंदर
अधरिं नभाच्या झळझळती शुभ मंत्रहि नक्षत्रांचे
सखि हें चिरमीलन हृदयांचें

पुणें,
१३-१०-४९

---

# अश्रु

उंच महालीं संगमरवरी सौधावरती
नृपकन्या कुणि बघण्या जीवन उभी एकटी
तलम रेशमी विरल मोतिया वसनें खुलती
नृपकन्येच्या कोमल हृदयीं दुःखें जळती !

खिन्न होउनी बघे पथावर गजबजलेल्या
मनुष्याकृती जगण्यासाठीं धडपडणाऱ्या
तोंच दिसतसे समोर कोणी अंध भिकारी
करांत ज्याच्या अन्न कोठलें रितीच थाळी

म्हणे, " उपाशी असेल याची कुणास चिंता
या दुबळ्या जीवास आंधळ्या कुणी न त्राता "
नृपकन्येच्या नेत्रांमधुनी अश्रू गळती
उंचावरुनी धुळींत पडती, धुळींत मिळती

समोर दिसती आणिक कोणी श्रमिक बिचारे
अन्नासाठीं वाहुन ओझीं जे शिणलेले
अंगावरलें दुबळें लक्तर लाज राखितें
लाज राखितें आणिक त्यांचे देह राक्षितें

म्हणे, "तयांना आज तरी का मिळेल भाकर
आणि मुलांच्या फुलेल का स्मित मृदु अधरांवर?"
नृपकन्येच्या नयनांमधुनी अश्रू गळती
उंचावरुनी धुळींत पडती, धुळींत मिळती

तों जातांना वारयोषिता समोर दिसते
जगण्यासाठीं देह आपुला कुणाहि विकते
अन्नासाठीं आत्म्याचाही केला विक्रय
जगण्यासाठीं झाली मृण्मय, झाली मृण्मय

नृपकन्या तिज बघते, म्हणते अन् अपुल्याशीं
"या स्त्रीत्वाचा बळी कुणाच्या वेदीपाशीं?"
नृपकन्येच्या नयनांमधुनी अश्रू गळती
उंचावरुनी धुळींत पडती, धुळींत मिळती

समोर पसरे जीवन शापित, वंचित, लांछित
समोर जळते जगणाऱ्यांची चिता सदोदित
तलम रेशमी विरल मोतिया वसनें घालुन
नृपकन्या ही सौधावरुनी बघते जीवन

उंचावरल्या नृपकन्येचे अश्रू गळती
उंचावरुनी धुळींत, पडती धुळींत मिळती

---

मुंबई,
२६-१२-४९

# ऋण

पृथ्विमाते ! मंगले गे अन्न तूं मातें दिलें
तूं कृपेच्या अमृतानें प्राण माझे पोशिले

तेज तुम्ही ओपिलें हो पितृदेवा भास्करा !
अंतरींच्या सृष्टिला दृष्टी दिली योगेश्वरा

तूं नभा ! पर्जन्यधारा वर्षिल्या आनंदुनी
दिव्य आशीर्वाद लाभे तृप्तिचा या ज़ीवनी

आणि वायू ! प्रेमळा हे बंधमुक्ता येउनी
छेडिली आनंद-वीणा माझिया प्राणांतुनी

गे निशे ! आलीस तूं अंधार-सिंधू घेउनी
अन् उषेची भव्य आशा तूं दिली गर्भांतुनी

अन् फुलांनो ! दिव्य या गंधांतलीं, रंगांतलीं
मूक गीतें तीं प्रभूचीं गुंफिलीं अभ्यंतरीं

हे मुलानो ! दूत तुम्हीं ईश्वराचे येउनी
गूज त्याचें दाविलें श्वासांतुनी, स्पर्शांतुनी

कर्मदेवांनो ! तुम्ही क्षेत्रांतुनी या कष्टलां
अन् श्रमांनीं जीवनाचा धर्म मातें दाविला

धारानृत्य

बांधवांनो ! अन् तुम्हीं दुःखांतली, सौख्यांतली
जीवनाची ओढ हो आत्म्यास या माझ्या दिली

आणि संतांनो ! तुम्हीं मृत्युंजयी श्रद्धा दिली
मीं उद्यांच्या जीवनाचीं दिव्य स्वप्नें पाहिलीं

मुंबई,
११-१-५०

———

## आले मेघ भरून

आले, आले मेघ भरून —

कुणि कलशांपरि, कुणि मयुरांपरि
कुणि काजळभरल्या नयनांपरि
कुणि वत्सल, कुणि चंचल, सुंदर अन् कुणि धुंद सजून
आले, आले मेघ भरून !

जललहरींवर फेन तरारे
पुष्पदळीं उमलले शहारे
अवखळ गाणें चपळ विजेचें ओसरलें लहरून
आले, आले मेघ भरून !

वळत वळत खग पळत नभांतुन
शुभ्र पांढरे अति आनंदुन
अक्षताच जणुं गंधर्वांनीं हंसत दिल्या उधळून
आले, आले मेघ भरून !

उन्मन चंचल पवन या क्षणीं
यक्षकवी जणुं धुंद गायनीं
नवथर मधुगंधांत गातसे स्वप्निल रव मिसळून
आले, आले मेघ भरून !

## धारानृत्य

आले अवचित थेंब कोवळे
क्षणांत सरसर भिजवित सगळें
उत्कट आतुर अमित करांनीं कणकण उरिं कवळून
आले, आले मेघ भरून !

मुकुट दंवाचे निजशिरिं घेउन
सम्राटापरि नटलें हें तृण
अन् नववधुपरि फुलें पाहती हीं लाजून हंसून
आले, आले मेघ भरून !

सजल गहन जग सगळें पळभर
सजल गंध, रस रंग चराचर
वसंतसेनेपरी धरा ही उभी जळांत भिजून
आले, आले मेघ भरून !

पुणे,
९-९-४९

---

## नवी वाट

दिसते वाट नवीन दुरून

क्षितिजापुढती धुक्यापलिकडे
स्वप्न धरेचें जिथें उलगडे
सुवर्णरस किमयेंत उषेच्या वाहतसे मिसळून
दिसते वाट नवीन दुरून

निःशब्दाची स्वप्नरागिणी
तिथें मोहरे कणाकणांतुनि
शब्दावांचुन अनंत कविता येती नित्य फुलून
दिसते वाट नवीन दुरून

इथल्या पाशांचें संमोहन
अन् आशांचें मधुर विलोभन
या सकलांचा मोह अचानक निखळे आज गळून
दिसते वाट नवीन दुरून

अतिथीपरि हें होय आगमन
प्रेमाचें लाभलें दिव्य धन
निघतांना फुलवात अश्रुंची उजळे नयनांतून
दिसते वाट नवीन दुरून

## धारानृत्य

अतां परी थांबलें बोलणें
कुजबुजणें, हंसणें अन् गाणें
मौनाच्या कलशांत तृप्तिचें अमृत येइ भरून
दिसते वाट नवीन दुरून

त्या वाटेस्तव अतां चालणें
तिथेंच माझें फुलेल गाणें
सुखदु:खाचीं रत्नें देइन तिथेंच मी उधळून
दिसते वाट नवीन दुरून

कोण तिथें आतुर माझ्यास्तव
घेउन कसलें अनुपम वैभव ?
छंद कोठले, शब्द कोठले, बघती वाट सजून
दिसते वाट नवीन दुरून

मुंबई,
५ ११-४९

---

# सकल कर्म आज मला सहजगान

आज अकारण कंपित पंचप्राण
सकल कर्म आज मला सहजगान

कर्म आज पुष्पांचें गंधार्पण
पर्णांचें अतिकोमल मृदुकंपन
कर्म आज सहकंपन, संवेदन
सकल कर्म आज मला सहजगान

हर्षित प्राणांत धवल कमल फुले
मृदुल उषास्वप्नांतिल स्मित उमले
कर्म आज मधुसेवन-आमंत्रण
सकल कर्म आज मला सहजगान

पवन फिरे गंध-गहन कुंजांतुन
पर्णांतुन गुणगुणती चंद्रकिरण
कर्म आज अक्षय आनंदध्यान
सकल कर्म आज मला सहजगान

बीज कुठें धरणींतुन विकसुन ये
स्तिमित, चकित, हरित प्राण उमलुन ये
कर्म आज सृजन मला नितनूतन
सकल कर्म आज मला सहजगान

## धारानृत्य

कर्म आज लंघुन ये सकल बंध
कर्म उषा, चिरसुंदर प्राण छंद
कर्म आज सुमधुर सर्वस्वदान
सकल कर्म आज मला सहजगान

मुंबई,
२७-२-५०

---

# गिधाडांची करुणकथा

कुरण हिरवें रसरसे भोंवतालीं
तृप्ति धरणीची मोहरून आली
मेघ अपुल्या मखमली स्निग्ध छाया
त्यांत पृथ्वीवर लागले धराया

कळप गायींचा अशा वैभवांत
चरत स्वच्छंदें बागडे सुखांत
कुणी सुस्तावुनि पहुडलीं मजेंत
कुणी तोषुनि धांवती हिरवळींत

आणि बाजूला थवा गिधाडाचा
आर्त बसलेला उपाशी कधींचा
बघे आशाळुनि भक्ष्य आपुलालें
नभीं आशेनें स्थिरावती डोळे

फुटे डोळ्यांतुन भुकेला विखार
क्षुब्ध चित्तीं अन् एक ये विचार
"कधीं येइल हो मृत्यु या गुरांना
भक्ष्य त्यांचें लाभेल क्षुधार्तांना ?"

म्हणति " लीला ही क्रूर ईश्वराची
दुजी याहुनि कोणती असायाची
पुष्ट गायींनीं चरावें खुशाल
हन्त ! प्रभुचें औदार्य हें विशाल ! ! "

पुणें,
३०-१-४९

---

# नवा इतिहास

घडतसे इथें नवा इतिहास

उग्र क्षुधेंतुन या दलितांच्या
अपमानित जखमांतुन त्यांच्या
स्वप्न नवें नभिं निर्मिति त्यांचे धगधगते निःश्वास
घडतसे इथें नवा इतिहास

इथें दुहींतुन अन् कलहांतुन
या रुधिरांतुन, या जहरांतुन
या चिखलांतुन कमलापरि ये विश्व नवें उदयास
घडतसे इथें नवा इतिहास

वीर इथें हिंसेविण लढले
संतांनीं आत्मार्पण केलें
ललनांनीं झेलून संगिनी लाजविलें असुरांस
घडतसे इथें नवा इतिहास

दिव्य येथली जीवननिष्ठा
सत्य-शांतिला इथें प्रतिष्ठा
समसत्तेस्तव वरतिल हांसत गळ्याभोंवतीं फांस
घडतसे इथें नवा इतिहास

## धारानृत्य

भंगण्यास भेदांचें कुंपण
करितिल येथें आत्मसमर्पण
तृण इथलें लोटिल पाताळीं बळिच्या सामर्थ्यास
घडतसे इथें नवा इतिहास

शिर उन्नत होईल श्रमांचें
रविसम उज्ज्वल प्राण कलांचे
पुण्यभूमिंतुन जन्मतील नव ख्रिस्त, बुद्ध अन् व्यास
घडतसे इथें नवा इतिहास

या इतिहासा साक्ष धरा.ही
साक्ष काल अन् साक्ष देवही
साक्षहि माझ्या हृदयिं युगंधर अन् उज्ज्वल विश्वास
घडतसे इथें नवा इतिहास

मुंबई,
२०-६-४९

---

# भाद्रपदांतिल रात

आज ही भाद्रपदांतिल रात
पर्णांचें भिजलेलें कंपन मिसळे अंधारांत

जुइचा हळवा गंध दरवळे
कंपित जलरव त्यांतुन मिसळे
आज नवें आकाश उमललें प्राणांच्या कोषांत
आज ही भाद्रपदांतिल रात

स्वप्नगूढ लहरींचें स्पंदन
क्षणोक्षणीं अद्भुत नितनूतन
विरघळती क्षितिजाच्या सीमा निळसर आनंदांत
आज ही भाद्रपदांतिल रात

आज नदीचे प्राण अनावर
वीणेपरि स्वरझंकृत परिसर
थरथरते अज्ञात वेदना कुसुमांच्या हृदयांत
आज ही भाद्रपदांतिल रात

पवनाच्या हृदयांत कोवळा
अननुभूत नव छंद उमलला
तरूंतरूंतुन स्वर-नक्षत्रें फुलली नाचत गात
आज ही भाद्रपदांतिल रात

**धारानृत्य**

आज उरीं आनंद नावरे
अतिरसांत सर्वांग गहिंवरे
मिळे अनिर्वच अन्तहीन वर मज जीवनगर्भात
आज ही भाद्रपदांतिल रात

मुंबई,
२१-३-५०

---

## कृष्णजन्म

उग्र घोर अंधार दाटला कोसळती जलधारा
करि रुद्रापरि भयकर तांडव उन्मद वादळवारा
अद्‌भुत युगसंदेश घोषवी वाणी दिव्य विजेची
प्रतिशब्दें त्या खचते, हलते कारा अंधाराची

बंदिघराच्या भिंतीमागें आज देवकी जागे
उदरिं तिचिया सृजन-वेदना, प्राण कळवळूं लागे
गजांतुनी मधुनीच निथळते अस्फुट चमक विजेची
अधिकच पुनरपि खिन्न गूढता भासे अंधाराची

स्वैर, भयद, थैमान चाललें पंचमहाभूतांचें
करित जयध्वनि धुंद वाहती उसळत ओघ जळाचे
हे वायू, क्षण थांब, आवरा मेघांनो, जलवृष्टी
घ्या कानोसा जन्म कुणाचा आज देवकीपोटीं ?

दुःख नको, देवकी ! या क्षणीं आठवुनी तें सारें
दुःख नको, कारुण्यमाउली ! स्मरुनि तुझीं गतबाळें
शोक नको देवते, या क्षणीं—याच क्षणाच्या पोटीं
सुफलित भक्ती चराचराची, सुफलित गे युगमुक्ती

पवनाच्या हृदयींचें स्पंदन क्षणभर उत्कट झालें
अमृत-निर्झर वसुंधरेच्या उदरीं उमलुनि आले
फुटला पान्हा अन् धेनूंचे आंचळ झाले ओले
बंदिघरीं कंसाच्या क्रंदत अन् प्रभु जन्मा आले

आले प्रभु जन्मास जाहले सजल नयन मातेचे
वसुदेवाच्या हृदयीं स्पंदन अमृत होउनि नाचे
विव्हल होउनि वदे देवकी, " रडूं नको घननीळा !
कुणि जर का ऐकेल, माझिया येइल मरण कपाळा

सुख वत्सांचें मिळूं नये मज, माझ्या हेंच ललाटीं
करांत येउन कांचन व्हावी स्पर्शें माझ्या माती !
तेंच पुन्हा का दुःख भयानक भविष्याचिया पोटीं
कलश सुधेचा होइल पुनरपि काय हलाहल ओठीं ? "

जहर भयाचें वसुदेवाच्या वत्सल हृदया-जाळी
खिन्न, उदास, सचिंत बसे निज कर लावून कपाळीं
तोंच अचानक वीज लखलखे करित वृष्टि तेजाची
प्रज्वळली प्रभुदर्शन-उत्सुक प्रतिभा आकाशाची !

त्या तेजाच्या क्षणीं पाहिलें मुख मंगल मातेनें
त्याच क्षणीं अन् सांवरिली निज श्रद्धा वसुदेवानें
भारावुनि दृढ धरिला त्यानें अंकुर निज हृदयाशीं
दुभंगून शृंखला त्या क्षणीं कोसळली चरणांशीं

हलुच बघे बाहेर, चराचर निद्रेच्या करपाशीं
द्वारपाल निद्रेंत घोर जणुं मूर्च्छनेंत द्वाराशीं
उठे त्या क्षणीं चुंबुनि कृष्णा, घेउनि अपुल्या हातीं
चित्त कठोर करून पिता अन् निघे जावयासाठीं !

वदे देवकी, " थांब। क्षणभर मज धरुं द्या हृदयाशीं
थांबा हो मज भिडवूं दे मुख, क्षणभर मृदु अधरांशीं
कुठल्या ग्रहदोषानें झालें संचित आज विषारी
शाप कुणाचा होउनियां शर लागे आज जिव्हारीं ? "

वसुदेवानें आवरिलें मन आणिक पुसले डोळे
देवकिचें मन वादळांतल्या फुलापरी थरथरलें
तोंच कडकडे तडिता गगनीं आणि सुचवुनी गेली
वियोगात या चराचराची मुक्ती सांठविलेली !

क्षणभर कसल्या तरि दुःखानें द्रवलें चित्त धरेचें
तीहि माउली–कळावया हें हृदय हवें मातेचें !
आणि निघे वसुदेव जावया निजकरिं प्रभुस धरोनी
मरणजयी श्रद्धेनें अद्भुत आलें हृदय भरोनी !

जी श्रद्धा रात्रीच्या हृदयीं वसते उदयापूर्वी
जी श्रद्धा विष प्राशन करतां शिव-हृदयाला ठावी
ज्या श्रद्धेचा परिस लागुनी दुरित पुण्यमय होतें
ज्या श्रद्धेनें बंधनांतही जीवनमुक्ती मिळते !

या श्रद्धेच्या स्पर्शें तुटले अडसर बंदिघराचे
लखलखून उजळलें विजेनें काजळ अंधाराचें
युगायुगांचें घेउनिया आश्वासन अपुल्या हातीं
निघे बद्ध वसुदेव घेउनी मुक्ती विश्वासाठीं !

जलदांनीं थांबविली वृष्टी अन् वेगाहि वायूनें
आणि प्रभूस्तव छत्र मखमली धरिलें अंधारानें
सजले तरु दर्शनार्थ घेउनि प्राण आपुल्या नयनीं
तृण इवलें वर येऊं पाहे बिलगण्यास प्रभुचरणीं !

नीरवता गंभीर भोंवतीं मग्न प्रभूच्या ध्यानीं
आणिक यमुना वाहूं लागे तृप्त तुडुंब भरोनी
उभा परी वसुदेव राहिला यमुनेच्या कांठाशीं
क्षणभर अधिकच दृढ धरिला प्रभु अन् अपुल्या हृदयाशीं !

चरण-कमल स्पर्शाचें अमृत वाटे तिजसि मिळावें
क्षणांत एका या जन्माचें अन् चिरसार्थक व्हावें
पदस्पर्श होतांच प्रभूचा, दुभंग यमुना झाली
अन् कमलापरि चरणांपुढतीं वाट उमलुनी आली !

आणि निघे वसुदेव जावया घराकडे नंदाच्या
ठेवण्यास हें जीवन-वैभव कुशीं नंदभार्येच्या
पाहिल का कुणि होउनि जागृत या रात्रीच्या प्रहरीं
शंका अवचित शल्यापरि हलु सलुनी हृदयीं गेली

परी गोकुळीं सकलांवरती संमोहन निद्रेचें
नित्य असें हें अद्भुत-मंगल संयोजन नियतीचें
आणिक जातां घरीं, यशोदा दिसली निद्रित स्वप्नीं
वात्सल्यानें अपुली कन्या हृदयाशीं घेवोनी !

मृदुल करें हलु ठेवुनि कृष्णा घेइ करीं कन्येसी
कमलदलानें दंवबिंदू जणुं घ्यावा निजहृदयाशीं
कुणा न कळलें होती केवळ साक्ष पृथ्विमातेची,
आकाशाची, वसुदेवाच्या धडधडत्या हृदयाची !

चोर पाउलीं निघे जावया जशी सरकते छाया
निघतांना क्षण बघे निरखुनी प्रभुच्या मुखसौंदर्या !
थरारलें आकाश त्या क्षणीं, थरारली भूमाता
अद्भुत युगसंदेश घोषवी आणिक पुनरपि तडिता

आला हलु वसुदेव जेधवां बंदिघराच्या दारीं
द्वारपाल निद्रेंतच होते, नीरवता भंवतालीं
बंदिगृहीं हलु शिरला, कन्या देवकिच्या करिं देई
रुदनाचा स्वर परिसुनि तिचिया, सभय दृष्टिनें पाही

त्या रुदनाच्या स्वरें जागृती द्वाररक्षकां आली
सावरून शस्त्रास्त्रें बघती बंदिघरामाझारीं
पळे कुणी त्वेषांत त्या क्षणीं कंसा वृत्त कथाया
दूत मृत्युचा निघे मृत्युला जणूं निमंत्रण द्याया !

हर्षानें कंसाच्या हृदयीं स्वर्गच फुलुनी आला
उन्मादें झिंगुनियां त्वेषें होउनि सज्ज निघाला
म्हणे, "मी तुझा मृत्यू-मी तर तुझे प्राण हरणारा
मी मृत्युंजय कोण त्रिभुवनीं मज जिंकूं शकणारा ?"

करांत घेउनि चरण कोंवळे आणि नंदकन्येचे
निघे शिळेवर आदळण्यास्तव क्रौर्य लोचनीं नाचे
म्हणे गर्जुनी, "मी वैऱ्याचा मृत्यु-प्राण हरणारा
मी मृत्युंजय कोण त्रिभुवनीं मज जिंकूं शकणारा ?"

वसुदेवानें मिटले डोळे, रडे देवकी माता
अश्रूंचा परि स्पर्श कोठुनी व्हावा त्याच्या चित्ता !
आणिक आतां मारणार तों जाय सुटून करींची
कडाडली आकाशीं विद्युत् दिव्य तिच्या प्राणांची !

झाला क्षणिं उद्घोष भव्य "हे कंसा, थांब जरासा
मृत्यु तुझा सुखरूप गोकुळीं; व्यर्थच दुष्टा आशा !"
पायतळींची खचली धरणी थिजलें रक्त उरींचें
'मृत्यु तुझा सुखरूप गोकुळीं' घुमले शब्द विजेचे

आणि पुन्हा अंधार दाटला कोसळल्या जलधारा
काळोखाशीं झुंजूं लागे भयकर वादळ-वारा
अद्भुत युगसंदेश दुमदुमे अवकाशांत विजेचा
पृथ्वीच्या स्वप्नांत कोंवळा अंकुर ये सोन्याचा !

गोकुळांत हंबरल्या धेनू, सजल नयन नंदाचे
अखिलांच्या हृदयांत दाटलें अमृत आनंदाचें
त्याच क्षणीं वत्सला यशोदा रडणाऱ्या कृष्णाला
पाजण्यास ओढुनिया घेई हळु वक्षाशीं अपुल्या !

---

## सखि तूं

भगवती उषेपरि तूं घनतमीं फुलावें
सखि तूं गायत्रि मंत्र प्राणांतुनि गावे

रसलोलुप माझें मन
जळलें जर विष प्राशुन
पूर्ण चंद्र होउन तूं आंतुनी हंसावें
भगवती उषेपरि तूं घनतमीं फुलावें

ध्येयास्तव आत्मार्पण
करण्या जर दुर्बळ मन
सहज तूं भयासुरास हंसत संहरावें
भगवती उषेपरि तूं घनतमीं फुलावें

हें घरटें हें कुंपण
घालिल जर मज बंधन
तूं जीवन-स्वप्न बनुन मजसवें उडावें
भगवती उषेपरि तूं घनतमीं फुलावें

जनिं असुनी मी विजनीं
जागृत असुनी स्वप्नीं
ओळखुनी मजसि तूं प्रकाशदान द्यावें
भगवती उषेपरि तूं घनतमीं फुलावें

## धारानृत्य

बंधनांत तूं मुक्ती
विप्लवांत आत्मशक्ति
त्रिविधताप वारुनि हे मजसि जागवावें
भगवती उषेपरि तूं घनतमीं फुलावें

मुंबई,
२२-१२-४८

---

## फुलारी

तूं तर चतुर फुलारी !

नीरवतेंतुन तुझिया उमलत
कृष्णकमल रजनीचें अदभुत
नक्षत्रांचे पराग त्यांतुन झळझळती अंधारीं
तूं तर चतुर फुलारी

कधिं प्रलयाच्या रात्रीं भीषण
करिसी रुद्रा, तांडव नर्तन
कधिं परि कोमल कमल होउनी फुलसि निळ्या कासारीं
तूं तर चतुर फुलारी

कधिं संध्येंतुन, इंद्रधनूंतुन
तूं रंगांचें फुलविसि मधुवन
कधीं उषेच्या वीणेंतुन तूं फुलविसि स्वर जरतारी
तूं तर चतुर फुलारी

वसंत येतां नाचत हांसत
मृदुल फुलांनीं स्थिरचर नटवित
मधुर स्वप्न मदनाचें फुलवित येसि धरेच्या दारीं
तूं तर चतुर फुलारी

## धारानृत्य

तृणपर्णांतुन तव मधु नर्तन
दंवबिंदूंतुन कोमल स्पंदन
तुझ्या करांनीं जललहरींतुन छेडिसि तूंच सतारी
तूं तर चतुर फुलारी

कणाकणांतुन तुज अनुभविलें
विकासांत तुज नित्य पाहिलें
युगायुगांच्या अमरण स्वप्ना जीवन-मरण-विहारी
तूं तर चतुर फुलारी

मुंबई,
४-७-४९

---

## हे मानव ये !

हे मानव ये ! हे मानव ये !

तिमिरांतुन ये, रुधिरांतुन ये
जहरांतुन ये, ज्वालांतुन ये
हे तुज नवयुग-आवाहन ये
हे मानव ये हे मानव ये

हे व्यथित कुणी, हे तप्त कुणी
हे पीडित, शोषित, आर्त कुणी
हे युगलांछित ! युगशापित ये
हे मानव ये हे मानव ये

मज वंश नको, मज वर्ण नको
रे, राष्ट्र नको वा धर्म नको
या भेदांच्या चिखलांतुन ये
हे मानव ये हे मानव ये

हे इमल्यांतिल धनवंता रे
हे तख्तांतील समर्था रे
ये भूवर खालीं उतरुन ये
हे मानव ये हे मानव ये

## धारानृत्य

हे कृषिक, तुझे श्रम घेउन ये
वा विणुनि वसन सकलांस्तव ये
अनिकेत ! क्षुधित ! अन् नग्नहि ये !
हे मानव ये हे मानव ये

मज त्याग हवे मज भोग हवे
मज गानासंगें श्रमहि हवे
ही जीवनदौलत घेउन ये
हे मानव ये हे मानव ये

रे मानवतेंतच देव तुझा
रे मानवतेंतच धर्म तुझा
सेवेंतुन मुक्ती सेवित ये
हे मानव ये हे मानव ये

हे जलधारांपरि क्षाळित ये
हे कविस्वप्नांपरि उजाळित ये
हे शुचिता, समता घोषित ये
हे मानव ये हे मानव ये

मुंबई,
१-६-४९

---

# आज नवा मी देव निर्मितों

आज नवा मी देव निर्मितों
आज नवा मी धर्म निर्मितों

फुले माझिया नेत्रांपुढती
नव्या जगाची दिव्य आकृती
नव्या आजच्या रक्तासाठीं
नवी स्मृती, संस्कृती निर्मितों
आज नवा मी देव निर्मितों

श्रमबिंदूंतुन या कृषिकांच्या
रुधिरांतुन जीवनवीरांच्या
अन् श्रद्धेंतुन मांगल्याच्या
आज नवे मी वेद निर्मितों
आज नवा मी देव निर्मितों

देव कालचे, धर्म कालचे
दास जाहले या यंत्रांचे
अन् चक्रांच्या सामर्थ्याचे ;
मी माझा अधिकार जाणतों
आज नवा मी देव निर्मितों

## धारानृत्य

कुणि भंवतीं अन्नाविण कण्हती
कुणि चक्रांतुन पिळले जाती
बंदिघरातुन कुणि तडफडती
अखंड मी त्यांच्यास्तव जळतों
आज नवा मी देव निर्मितों

विशाल माझी जीवन-नीती
अन् भेदांच्या अतीत प्रीती
मी मृत्युंजय कुठली भीती ?
नव्या मानवास्तव मी लढतों
आज नवा मी देव निर्मितों

गुलाम जेथें कुणि न कुणाचें
जिथें नसे शोषण दुबळ्यांचें
राज्य जिथें समता-शांतीचें
असें नवें मी विश्व घडवितों
आज नवा मी देव निर्मितों

श्रद्धा ज्यांची या विश्वावर
या भव्योज्ज्वल भवितव्यावर
या ! जे कुणि यज्ञास्तव तत्पर
मी तर केवळ यास्तव जगतों
आज नवा मी देव निर्मितों

मुंबई,
२-७-४६

# कविता आज निराळी

कविता आज निराळी, अमुची कविता आज निराळी
कधिं अश्रूंपरि कोमल अन् कधिं उग्र भयंकर काली

हीं दलितांची, ही पतितांची
ही श्रमिकांची अन् व्यथितांची
समता, शुचिता आणिक शांती प्रस्थापीत निघाली
कविता आज निराळी, अमुची कविता आज निराळी

वत्सल ही क्षुधितांना भरविल
अनिकेतांना कुशींत घेइल
कोसळून मत्तांचें आसन तडितेपरि ही जाळी
कविता आज निराळी, अमुची कविता आज निराळी

ही भंग्याघरिं गाइल गाणीं
पुसेल अन् डोळ्यांतिल पाणी
निज केसांनीं झाडिल आंगण, ही त्यांची कैवारी
कविता आज निराळी, अमुची कविता आज निराळी

गाइल ही संतांचा गौरव
अन् जीवन—वीरांचें वैभव
रेखिल स्वप्नें नक्षत्रांनीं आणि नभाच्या भाळीं
कविता आज निराळी, अमुची कविता आज निराळी

## धारानृत्य

विमोचनास्तव ही विश्वाच्या
झुंजुनि आणिल कलश सुधेचा
विनतेसम जनतेचें जीवन घेइल मुक्त उभारी
कविता आज निराळी, अमुची कविता आज निराळी

मुनिहृदयापरि ही चिरमंगल
फुलांमुलांपरि निर्मल, कोमल
ही द्वैताचें दुःसह अंतर स्पर्शें सहज निवारी
कविता आज निराळी, अमुची कविता आज निराळी

उदयें हिचिया स्तिमित दिगंतर
स्तिमित धरित्री, स्तिमितहि अंबर
मानवतेस्तव उदरिं प्रभूचा गर्भ घेउनी आली
कविता आज निराळी, अमुची कविता आज निराळी

मुंबई,
१९-६-४९

---

# शहारला काजवा

वळणावरल्या घरीं उमलला कमल-दीप केशरी
अन् भ्रमरांपरि थवे स्वरांचे गुणगुणले अंतरीं

इंद्रधनूच्या रसांत भिजुनी चंद्र बघे हांसुनी
गोड, निळा आनंद वाहतो आणि चांदण्यांतुनी

तृणपर्णांतुन मधुरजनीचा स्पर्श झरे भर्जरी
जळांतुनी छायांची भिजली कुजबुज ही मख्मली

उभी बकुळ सांवळीं हांसरीं सुगंधस्वप्नें तळीं
औदुंबर हळु बघे तिजकडे थरारुनी अंतरीं

तिच्या कटाक्षें उरीं तयाच्या रंग उसळला नवा
पालवींत पलिकडल्या हंसऱ्या शहारला काजवा

उरण-मुंबई,
२०-१-४८

---

# आमार जीवन ई आमार बानी

[ नौखालीच्या यात्रेच्या वेळीं गांधींजींजवळ कुणीं तरी संदेश मागितला. त्यांनीं लिहिलें ' आमार जीवन ई आमार बानी '–आमचें जीवन हीच आमुची वाणी आहे. ]

आमुचें जीवन मंगल गान
आमुचें जीवन, अमुची वाणी, चिरमांगल्यनिधान

फुलांपरी फुलतों, दरवळतों
झऱ्यापरी हंसतों, झुळझुळतों
करुणाघन उधळतों जगावर सर्वस्वाचें दान
आमुचें जीवन मंगल गान

तृणाहुनी अम्हि विनम्र, अवनत
हिमालयाहुनि उदात्त, उन्नत
कुसुमाहुन मृदुकोमल असुनी वज्राहुन बलवान
आमुचें जीवन मंगल गान

कलहाच्या दारुण जहरांतुन
रुधिरामधुनी अन् अस्थींतुन
जाउं एकले वैष्णव यात्री देत कलिस आव्हान
आमुचें जीवन मंगल गान

दास्यीं अमुचे जेथें बांधव
तिथें साधना अमुची अभिनव
तृणातृणांतुन निर्मू अर्जुन, धुळींतून हनुमान
आमुचें जीवन मंगल गान

भूक आमुची गिळील त्रिभुवन
हंसत परी साहतों उपोषण
अर्धनग्न अम्हि, श्रद्धा अमुचें एकच वस्त्र महान
आमुचें जीवन मंगल गान

धर्म आमुचा विश्वबंधुता
कर्म आमुचें शुचिता, समता
परमविरागी असून आम्ही अनुरागाचे प्राण
आमुचें जीवन मंगल गान

विशुद्ध अमुचा मार्ग हरीचा
जो शूरांचा अन् वीरांचा
ज्वलन आमुची नित्यसाधना विश्वमुक्तिचें वाण
आमुचें जीवन मंगल गान

मुंबई,
१८-९-४९

---

# माती

माती ऽ माती ऽ मंगल माती

श्रावणधारा, विजांचा मारा
वादळ गर्जो, नसो निवारा
निर्भय हंसते मातेची छाती
माती ऽ माती ऽ मंगल माती

फुलांची माता, फळांची माता
वीरांची भूमी, संतांची गाथा
वात्सल्यगायत्री जीवनमूर्ती
माती ऽ माती ऽ मंगल माती

दक्षिण हिची, उत्तर हिची
पश्चिम, पूर्वा, हिच्या कुशीची
भेदांच्या अतीत असीम व्याप्ती
माती ऽ माती ऽ मंगल माती

ग्रीष्मांत अग्नी जाळितो जेव्हां
सुकून सरे नद्यांचा ठेवा
आचरी तपास राहून व्रती
माती ऽ माती ऽ मंगल माती

नांगर, विळे, फाळांच्या धारा
कापीत जाती हिचिया उरा
असह्य वेदना माऊलीपोटीं
माती ऽ माती ऽ मंगल माती

परंतु येती पर्जन्यधारा
जीवनधारा, अमृतधारा
वरांची मंगल करीत वृष्टी
माती ऽ माती ऽ मंगल माती

पेरिल्या बीजां लागतें पिसें
फुटतें पोटीं हिरवें हंसें
करिते सफल धारणाशक्ती
माती ऽ माती ऽ मंगल माती

हिचिया वक्षीं पर्वत उभे
वृक्षांच्या रांगा, अरण्य शोभे
निर्जीव सजीव सर्वांची सृष्टी
माती ऽ माती ऽ मंगल माती

परंतु केव्हां हिचिया गात्रीं
वेदना जळे, आंसवें नेत्रीं
स्फुंदते एकटी अमेच्या रातीं
माती ऽ माती ऽ मंगल माती

अशीच जेव्हां क्रूसाच्या वरी
रुतले खिळे ख्रिस्ताच्या उरीं
रक्तांत भिजून क्रंदली होती
माती ऽ माती ऽ मंगल माती

## धापनृत्य

क्रंदते जेव्हां पिकून शेतें
श्रमिक सारे कंगाल रिते
    असंख्य मानव उपाशी पोटीं
    माती ऽ माती ऽ मंगल माती

पाहते जेव्हां युद्धाच्या ज्वाळा
भूगोल गिळूं पाहती सारा
    मानवमाउली व्याकुळ चित्तीं
    माती ऽ माती ऽ मंगल माती

परंतु आहे अजून आशा
अभंग आशा, अमर्त्य आशा
    अणूच्या गर्भांत क्रांतीची शक्ती
    माती ऽ माती ऽ मंगल माती

मृत्यूच्या भयें कांपोत सारे
ढळोत तारे, ढळोत वारे
    हांसतो वसंत हिचिया पोटीं
    माती ऽ माती ऽ मंगल माती

सरेल आई ! संहार सारा
भंगून पडे अंधार-कारा
    चालूं दे भ्रमण सूर्याच्याभोंतीं
    माती ऽ माती ऽ मंगल माती

मुंबई,
४-१२-४९

## ग्रीष्म-गीत

ग्रीष्म माझिया दारीं आला, ग्रीष्म माझिया दारीं
अन् भ्रमरांचे थवे विलासी वळति अतां माघारी

रस गंधांचे सुकले निर्झर
अन् स्वप्नापरि विरले परिमल
जाळित जळते कणाकणांतुन दाहक आग विषारी
ग्रीष्म माझिया दारीं आला, ग्रीष्म माझिया दारीं

मालवली पर्णांची किलबिल
शुष्क होय कुरणांतिल मखमल
पुढें पदांच्या तृषित, व्यथित, पथ अन् नयनीं अंधारी
ग्रीष्म माझिया दारीं आला, ग्रीष्म माझिया दारीं

झुरुनि पाकळ्या नकळत गळल्या
तप्त धुळीच्या कुशींत दडल्या
भुलवित, फसवित, चंचल, निर्दय, मृगजळ चित्त विदारी
ग्रीष्म माझिया दारीं आला, ग्रीष्म माझिया दारीं

तुझ्या परी रे ! स्थिरचर जळतें
गिरि, दरि, सागर, तृण, कळवळतें
वेदनांत परि याच उद्यांची प्रेरक दिव्य तरारी
ग्रीष्म माझिया दारीं आला, ग्रीष्म माझिया दारीं

धारानृत्य

खन्त वृथा कां हृदया आतां
घे ज्वलनांतहि नवरसमयता
उदासल्या पंखांतच तुझिया नूतन भव्य उभारी
ग्रीष्म माझिया दारीं आला, ग्रीष्म माझिया दारीं

जळत जळत चल उधळ लकेरी
' मेघ ' आळवित मार भरारी
हंसतिल, फुलतिल असंख्य कमळें या जीवनकासारीं
ग्रीष्म माझिया दारीं आला, ग्रीष्म माझिया दारीं

---

# जीवन ! जीवन !

तापलें आकाश तापली जमीन
कण कण जळे उन्हांत दारुण !

पथीं गजबज मानव चालले
हांसत बोलत धरेचीं लेंकरें

आणिक बाजूस गलित विपन्न
भिकारीण एक राहिली पडून

अंगींचीं लक्तरें पुरतीं विटून
करिती तियेच्या लज्जेचें रक्षण !

रक्षण कशाचें वृथाच आभास
काय लज्जा कधीं असे निर्धनांस ?

एक सान जीव तिचिया गर्भांत
कण्हतो, कष्टतो येण्यास जगांत !

भरतां दिवस परंतु बिचारी
पथाच्या कुशींत पडून राहिली !

असह्य वेदना तिला न आवरे
धुळींत लोळत खुळी तळमळे !

## धारानृत्य

उद्यांची माउली विवस्त्र ! कण्हत !
जळत उसासे कष्टत ! क्रंदत !

रक्तांत माखलीं आतां तीं लक्तरें
आणि आक्रोशत बालक जन्मलें !

जखमी मातृत्व मूर्च्छित ! विक्रांत !
चालले मानव बघत घाईत !

कुणीसें हळूच आणि खिशांतून
नाणें टाकीतसे निकट जाऊन

नाणें न पडे तें जीवन व्यापारी ! !
पडे खिशांतली संस्कृती रुपेरी ! !

आणिक माशांचा थवा आनंदून
नाचत बागडे रक्तांत हर्षून !

नूतन बालक करीत रुदन !
इवलाले पाय पाही नाचवून !

धुळींत, रक्तांत स्फुंदन, स्पंदन—
करीत पडलें आंधळें जीवन ! !

जीवन ! जीवन ! कोंवळें ! नूतन !
विवस्त्र—उघडें जीवन ! जीवन !

मुंबई,
१८-७-४९

# दुपार

धगधगतें हें ऊन भोंवतीं
विकल मेदिनी, विकल चराचर
उरीं दाटुनी आग विषासम
तळमळतो हा अथांग सागर !

यातनांस त्या बंधन कसलें ?
जसें मृत्युचें मुक्त आगमन !
नकळे कसला क्रोध जळे हा
विकल कराया कणकण जीवन !

परी जळाच्या जळत्या हृदयीं
कलाबुती मीनांची सळसळ
जळत्या नेत्रीं जळत्या गात्रीं
दिसे भर्जरी जीवन सुंदर

अशींच या देहांतिल दुःखें
दुपारच्या जलधीसम जळतां
विकल होय मी जललहरींसम
उरीं पेटुनी गहन आर्तता !

यातनांत परि जळतां जीवन
आकळते मज अथांगता मम
मृत्यूंतिल सौंदर्य दिसे मज
होय भर्जरी हृदयांतिल तम !

---

# रे रानपांखरा

रे रानपांखरा, रानपांखरा !

तुला कितिकदां पाहियलें मीं
गात, मुक्त उडतांना व्योमीं
रुततां सलतां अंतर्यामीं
माझ्या मज शृंखला —
रे रानपांखरा, रानपांखरा !

पंख तुझे स्वप्नांपरि कोमल
गीत गळ्यांतिल तुजपरि निर्मल
फुलविसि वनिं तूं उचळित सुस्वर
मोत्यांचा फुलवरा —
रे रानपांखरा, रानपांखरा !

तुजभंवतीं जग हिरवें सुंदर
शिरीं नितनवें अनंत अंबर
तुझ्यासवें रे गाती निर्झर
हंसवित सारी धरा —
रे रानपांखरा, रानपांखरा !

कधीं गिरींतुन, कधीं दरींतुन
कधिं पर्णांतुन, कधीं फुलांतुन
वारिसि स्पर्शित तव चिरयौवन
दुःख मरण अन् जरा —
रे रानपांखरा, रानपांखरा !

मला घराचें अडवी कुंपण
आणि चार भिंतींचें बंधन
अकिंचनच मी जमवुनि कांचन
खिळलों माझ्या घरा —
रे रानपांखरा, रानपांखरा !

सांग कधीं तुज या नयनांतिल
मुकीं आसवें दुरून दिसतिल
कधीं तुझे स्वर ओढुनि नेतिल
तोडुनि या पंजरा —
रे रानपांखरा, रानपांखरा !

मुंबई,
२-७-४९

———

# कर्मयोगी विश्वयोगी

आज माझ्या अंतरीं ये शांतता, संपन्नता
वर्षिती गंधर्व शीर्षीं या विजांच्या अक्षता

कल्पनांच्या या दिव्यांना आज तेजोवेग ये
अन् मनाच्या चांदण्याला चंदनाचा गंध ये

मी फुलांचा रंग झालों अन् स्वरांचें हृद्गत
या मुलांच्या कोंवळ्या डोळ्यांतलें तें अमृत

हांसलों, संतोषलों अन् अस्थि-वज्रें मीं दिलीं
अमृतानें मृत्युच्या मीं स्वर्गभूमी रक्षिली

सागरांच्या अंतरीं मीं तांडवांनीं गर्जलों
पीडितांच्या पाउलीं अन् वादळांनीं क्षोभलों

दुःख मीं हें पाहिलें अन् दुःख मीं हें साहिलें
सांडुनी मीं रक्त माझें हे युगात्मे क्षाळिले

आत्मशांती प्राशुनी मी हांसलों बुद्धापरी
अन् हृदींच्या मंगलानें मेदिनी आलिंगिली

कर्मयोगी विश्वयोगी जीवनाचा योग मी
आणि पोटीं या नभाच्या, तो विजेचा गर्भ मी

मुंबई,
१६-८-४७

## प्रकाशांतला शृंगार

आपुला प्रकाशांत शृंगार
रुचेल त्यांना गडे रुचूं दे कृष्ण, गडद अंधार

प्रकाशांत अपुलें आलिंगन
प्रकाशांत सखि अपुलें चुंबन
प्रकाशांत झळझळतो, जळतो गात्रांतिल अंगार
आपुला प्रकाशांत शृंगार

प्रकाशांत मकरंद थरथरे
अन् भ्रमरांचें वेड मोहरे
प्रकाशांत सखि हंसत उमलतो कमलांचा अभिसार
आपुला प्रकाशांत शृंगार

प्रकाशांत लहरींचें मार्दव
कलाबुतीचें वरितें लाघव
आपुल्यासाठीं विणिति लाजऱ्या फेनफुलांचे हार
आपुला प्रकाशांत शृंगार

प्रकाशांत पवनाची भाषा
करि गंधित पुष्पांची आशा.
अभिलाषेच्या गात्रीं फुलती स्वप्नांचे आकार
आपुला प्रकाशांत शृंगार

## धारानृत्य

प्रकाशांतलें वेड आपुलें
असो, असूं दे जगावेगळें
जगावेगळ्या स्वर्गी अपुला अद्‌भुत स्वप्नविहार
आपुला प्रकाशांत शृंगार

प्रकाशांतलें अपुलें मीलन
उरेल होउन निळी आठवण
अन् सरतां दिन नक्षत्रांनीं उजळिल अंधःकार
आपुला प्रकाशांत शृंगार

मुंबई,
२२-३-५०

---

# आंतलें हें घर माझें

आंतलें हें घर माझें तुझ्या डोळां आढळेना
ओळखीची पायवाट शोधूनिही सांपडेना

मळलेल्या वाटेवर उभ्या वांकलेल्या वेली
माझ्या खळ्यांत सांवळ्या पडे पानांची साउली

कौलांवर दाटलेली चांदण्याची निळी जाळी
देवघरांतून माझ्या संथ ज्योत ओथंबली

जागतात घरांत या दिवे ओल्या लोचनांचे
आसवांच्या प्रकाशांत निळें रूप अनंताचें

कशी तुज आढळावी अंतरींची द्वारका ही
कणकण गुंतलेलें तुझें मन तुझ्या देहीं

द्वारकेच्या भोंवतीं या अनंताचें सुदर्शन
निराकार होऊन ये उरीं माझ्या प्रकाशून

स्मरतां तूं व्याकळून होईन मी कासावीस
गळां ओथंबून रडें दिसशील लोचनांस !

आंतल्या या घरांतली तुझ्या ओळखीची वाट
तुझ्यासाठीं ओथंबली देवघरांतली ज्योत !

मुंबई,
२४-९-४६

---

# रुद्रसौंदर्य

शिरिं अपुल्या जरि वादळले ढग
कलश दिशांचे फुटले खळखळ
काळोखाच्या धनुष्यांतुनी
आणि विजांचे जरि सुटले शर

नरसिंहापरि अथवा सागर
विदारण्या सजला धरणीतल
नक्षत्रांचे गोल निखळले
उसळे, खवळे वादळ ! वादळ !

कर हृदया तूं हंसुनी स्वागत
निसर्ग जिकडे तिकडे मंगल
उरीं तयाच्या अमृत भरलें
तो जननीसम प्रेमसुधाकर

रस-वसंत तो कधीं हांसतो
कधिं मायेनें ओपी जीवन
कधिं रुद्रापरि धुंद होउनी
करितो तांडव दिशांदिशांतुन

## धारानृत्य

जागृतींत स्वप्नाहुनि सुंदर
कवि तुजसम जे निज हृदयांतुन
अभिव्यक्ती चिरसौंदर्याची
तळमळती हें करण्या जीवन

निसर्ग त्यांच्या स्वप्नांमधुनी
लखलखतो होउनि नवजीवन
अदृष्टांतिल रेखुनि अलका
उजळी त्रिभुवन आणि चिरंतन

भव्य रुद्रसौंदर्य मना हें
प्राशुनि घे तूं निर्भय होउन
कोमलतेच्या, भीषणतेच्या
अन् मृत्यूच्या अतीत उजळुन

मुंबई,
२८-११-४७

---

# येइ बुद्धराज

येइ बुद्धराज आज अंतरांत माझिया
आळवून दिव्य भाव शांतिगीत गावया
तूं तरूतळीं मिटून आर्त नेत्र आपुले
मृत्युच्या घरांत लाख दिव्य दीप लाविले
प्रेम, शांति मंत्र दिव्य या जगास तूं दिले
मृत्युच्या अतीत तूं प्रकाशमार्ग रेखिले
आज जीवनावरील प्रेम कोसळे, जळे
शांतिचा प्रकाश या तमोयुगांत विर्घळे
जें तुवां प्रकाशस्वप्न अंतरांत पूजिलें
मानवांचिया अजाण शोणितांत काजळे
येइ शांतिराज ! आज अंतरांत या क्षणीं
आत्मराग गौरवून दे प्रकाश स्पर्शुनी
हास्य तें तुझें निळें नभापरी उरीं फुलो
आत्मज्योत पालवून गात्र गात्र प्रज्वळो
रे झुलून मोहरोत अंतरांत या दिवे
काजळावरी चितार चित्र ज्योतिचें नवें
शब्दब्रह्म सत्यरूप अंतरांत मोहरो
आंधळ्या युगांस वाट दाविण्या उचंबळो

मुंबई,
८-१-४७

# आंधळा

डोळ्यांच्या कावडी  भरून काळोख
चालला एकला  आंधळा पथिक

करीं एकतारी  गळा दाटलेला
एकाच सुरांत  मनाचा उमाळा

अनंत रसांचें  ऋतूंचें नर्तन
कधीं न पाहिलें  लोचन भरून

तमांतून आलें  जीवन आंधळें
कांहींसें शोधीत  तमांत चाललें

भोंवतींचें जग  आपुल्या नादांत
भ्रमते मेदिनी  अखंड भ्रमांत !

म्हणतात कुणी  भोंवतीं प्रकाश
फुलांचा फळांचा  यौवनविकास

आणिक वाटतें  हृदयीं तयास
पहावें जीवन  प्रकाशविलास

परंतु दिसतो  गहन अंधार
आंत कसलेंसें  दुःख निराकार !

## धारानृत्य

पुसतां तयांस प्रकाशाचा अर्थ
म्हणती ‘ आंधळा ’ हंसून निरर्थ

आणिक म्हणे हा ‘ बरें हें जीवन
उघड्या डोळ्यांचें नको अंधपण

माझियापरीच जीवन आंधळें
अंधाराभोंवतीं फिरती सगळे ’

मुंबई,
२५-९-४७

---

## उषा

हास्यिं तिच्या फेनदीप नवलानें न्हाले
नेत्रिं तिच्या मेघ निळे गंहिवरुनी आले

ओठांतुन लास्य लाल कोवळ्या दिव्यांचें
मौनांतुन गान तिच्या गहन शाश्वतीचें

पापण्यांत स्वप्न तरल पारिजातकांचें
आणि पावलांत गोड नाद सावल्यांचे

भाळिं तिच्या देवसभा ही तटस्थ झाली
पार्थिवता अस्तित्वें उजळुनी निघाली

जागृति ही स्वप्नमयी आकारित झाली
हृदयांतिल चिन्मूर्तिस आणि साद घाली !

सत्य तिच्या स्पर्शास्तव शिव-सुंदर झालें
अन् त्रिकाळ शिरिषासम मोहरुनी आले

ही गंगा सुंदरता होउनिया आली
रेखाया शाश्वतता सगरांच्या भाळीं

क्षाळुन मज उजळुन, मम चित्स्वरूप झाली
प्राणांतुन कमलापरि उमलुनि ही आली

उरण-मुंबई,
१७-३-४७

# जांभळी नीज ये

जांभळी नीज ये, जांभळी नीज ये

कंप काळे निळे
त्यांत छाया मिळे
जलदरूपें ध्वनी मंदिरांतून ये
जांभळी नीज ये, जांभळी नीज़ ये

खिन्न रायांतली
काजळी कांपरी
काजव्यांनीं फुले गंध रंगीत ये
जांभळी नीज ये, जांभळी नीज ये

ज्योतिंच्या पाकळ्या
लवुन ओथंबल्या
दीप निजले खुळे, रात्र स्वप्नांत ये
जांभळी नीज ये, जांभळी नीज ये

वस्त्र गळतां निळें
चांदणें लाजलें
सावल्यांच्या उरीं वासना धुंद ये
जांभळी नीज ये, जांभळी नीज ये

क्रूस वाटेवरी
तिमिर बिलगे उरीं
पांथ चुकला कुणी, मार्ग शोधीत ये
जांभळी नीज ये, जांभळी नीज ये

शुभ्र सुमनांवरी
आकृती सांवळी
पाकळ्यांच्या करें, दीप शमवून ये
जांभळी नीज ये, जांभळी नीज ये

---

## अजाण, अजाण !

रित्या पथावर रक्तांत न्हाऊन
अचेतन कोणी मिटून लोचन
जीवाची आसक्ति विरली शून्यांत
शरीर पालथें पडलें धुळींत !
रक्ताचें थारोळें देहीं न मावून
क्षाळाया धरित्री चाललें वाहून !

बाहुलीचें लग्न तसेंच टाकून
आलीस तयास पहाया धांवून
पुससी मजला "कोण हा बिचारा ?
पाहूं या जाऊन रक्तांत भिजला"
शंकेचें काहूर लोचनीं पाहून
वदलों तुला मी सूडानें पेटून !
"दुष्ट हे राक्षस दुसऱ्या धर्माचे
लाभलें तयांस शासन मृत्यूचें"

कसें व्हावें परी तुझें समाधान
विचारिसी मला आणि गोंधळून
"मोडतां मीं कधीं चिमणीचें घर
लोटितो ईश्वर पापांचे डोंगर
देवाचें लेंकरूं रक्तांत माखून
मारितां देई न देव कां शासन ?"

ऐकून तुझी ही भावना अजाण
नकळे कशानें भरले लोचन
आमुच्या जगाची तुला न कल्पना
सारींच भावंडें तुझिया लोचना
सारींच लेकरें तुझिया देवाचीं
अनंत माणसें तुझिया मायेचीं
जीवनास तुझ्या स्पर्श न मृत्यूचा
कुठून प्रेमास संपर्क द्वेषाचा ?
किड्यांपरि आम्ही आमुच्या रक्तांत
अखंड लोळतों जळत द्वेषांत
तुझ्या अज्ञतेंत युगांचें जीवन
आम्हीच अजून अजाण, अजाण !

मुंबई,
२८-३-४६

———

# उजळित तम मज जळुं दे

मज तुझिया या जगांत कष्टुं दे सुखानें
उजळित तम मज जळुं दे आंतल्या बलानें

प्रेम जिथें भोगास्तव तुडविती मदानें
देह जिथें मन दडवी वासना-तमानें
त्या हृदयीं मज फुलुं दे ज्योतिच्या स्मितानें
मज तुझिया या जगांत कष्टुं दे सुखानें
उजाळित तम मज जळुं दे आंतल्या बलानें

जे दुबळे मीपणांत कोंडुनिया प्रीती
हृदयांतिल प्रेमामृत हालाहल करिती
त्या हृदयीं हांसवीत नाचवीत शांती
नयनांतुन विरघळुं दे अश्रुंच्या स्मितानें
मज तुझिया या जगांत कष्टुं दे सुखानें

आणिक जे अंध कुणी घर अपुलें मुकले
परमामृत त्यजुन खुळे मोहिनीस भुलले
कल्पतरू असुनि घरीं शोकाकुल झाले
अंतिम दिन मज त्यांचा हंसवुं दे उषेनें
उजळित तम मज जळुं दे आंतल्या बलानें

जीवन अन् मरण यांत स्वप्न विकासाचें
जलवंती शोधित नित सत्य सागराचें
कलिकेच्या पूर्णतेंत पतन पाकळ्यांचें
कळुनि हंसत पूर्णब्रह्म उजळुं दे नव्यानें
उजळित तम मज जळुं दे आंतल्या बलानें

विकसुन प्रभु प्रेम तुझें हृदय दिव्य झालें
वीणेवर आत्म्याच्या गात कुणी आलें
स्वरद्युतिचे साममंत्र देहांतुनि स्त्रवले
स्थिरचर हृदयांत अतां वितळुं दे सुखानें
उजळित तम मज जळुं दे आंतल्या बलानें

१७-३-४७

---

# खिन्न मांडवांत ये

खिन्न मांडवांत ये अबोल ही स्वराली
सांध्यराग सावल्यांत काल्वून आली

क्षितिज जांभळें निळें किनार आसवांची
पाकळ्यांत शीळ नील मोहरे खगांची

मंत्रमुग्ध ध्यानमुग्ध पापणी जळाची
लाल जांभळी तयांत सावली कुणाची

स्वप्न मागलें स्मरून लाजली अबोली
वेदना उरांतली फुलून सांद्र झाली

गुंतुनी पडे जळांत वेल सावल्यांची
गंधयुक्त त्यावरी फुलें निळ्या स्वरांचीं

मंद जाहला प्रकाश, श्वास खिन्न झाले
मांडवांत मूक नाद काजळांत न्हाले

आर्त हालचाल होय दूरच्या दिव्यांची
अंतरें फुलून येत कांपऱ्या क्षणांचीं

खिन्न मांडवांतली अबोल ही स्वराली
सावल्यांत विघळून सांवळीच झाली

सासवणें,
२९-४-४६

---